कोविड-१९ च्या तपासणीसाठी जिल्हा रुग्णालय, सातारा येथे RT PCR लॅब स्थापन करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कोरोना-२०२०/प्र.क्र.१७२/आरोग्य- ५**
गो. ते. रुग्णालय संकुल इमारत,
१० वा मजला, मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
तारीख ०६ जुलै, २०२०

वाचा :-

१) **सार्वजनिक आरोग्य विभाग शासन पत्र क्र. कोरोना-२०२०/प्र.क्र.५८/आरोग्य-५, दिनांक २४.०३.२०२०.**
२) **जिल्हाधिकारी, सातारा कार्यालयाचे पत्र, दिनांक ११.०६.२०२०.**
३) **मा. उच्च न्यायालय, मुंबई यांचे दिनांक १९.०६.२०२० चे आदेश.**

प्रस्तावना :-

सातारा जिल्ह्यात RT PCR लॅब नसल्याने, कोवीड-१९ च्या चाचणीसाठी स्वॅब नमुने बी.जे. वैद्यकीय महाविद्यालय, जि. पुणे किंवा एन.सी.सी.एस. पुणे येथे पाठविण्यात येत आहेत येथे पाठविण्यात येत आहेत. जिल्ह्यात येणारी बहुतांश कुटुंबे ही कंन्टेमेंट झोन/हॉटस्पॉट झोन/रेड झोन मधील असल्याने, या सर्व नागरिकांचे आयसीएमआरच्या मार्गदर्शक सूचनांनुसार ILI/SARI लक्षणे असल्यास, कोवीड-१९ ची तपासणी करणे अनिवार्य ठरत आहे. या तपासणीसाठी व अहवाल प्राप्तीसाठी लागणारा कालावधी बघता या सर्व नागरिकांना संस्थात्मक विलगीकरण कक्षात ठेवणे आवश्यक असल्याने, प्रशासकीय यंत्रणेवर अनावश्यक ताण येत आहे व मोठ्या प्रमाणात खर्चही होत आहे. ही परिस्थिती बघता जिल्हा रुग्णालय, सातारा येथे RT PCR लॅब स्थापन करण्याची नितांत आवश्यकता असल्याने, जिल्हाधिकारी, सातारा यांचा जवळपास रू. ७५,४६,१८६/- अंदाजित खर्चाचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाला आहे. आपतकालीन परिस्थितीत तातडीची बाब म्हणून यासाठीचा खर्च राष्ट्रीय आपत्ती निवारण निधी किंवा जिल्हा नियोजन समिती निधीमधून करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. संदर्भ क्र. १ मध्ये नमूद पत्रान्वये, राज्यात कोवीड-१९ चा प्रादुर्भाव रोखण्यासाठी प्रतिबंधात्मक उपाययोजना व उपचारासाठी वैद्यकीय साहित्य व उपकरणे यांची खरेदी जिल्हास्तरावर जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली गठित समिती यांच्या मान्यतेनुसार व शिफारशीने करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे.कोवीड-१९ मुळे उद्भवलेली आरोग्य विषयक आपतकालीन परिस्थिती लक्षात घेता, खालीलप्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

१) कोवीड-१९ चा वाढता प्रादुर्भाव लक्षात घेता, जिल्हा रुग्णालय, सातारा येथे RT PCR लॅब उभारण्यासाठी या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२) RT PCR लॅब उभारणीसाठी आवश्यक असलेला रू. ७५,४६,१८६/- (रू. पंचह्यात्तर लक्ष सेहचाळीस हजार एकशे शहाऐंशी) इतका **राष्ट्रीय आपत्ती निवारण निधी/जिल्हा नियोजन समिती** मधून खर्च करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

३) या RT PCR लॅबसाठी लागणारी यंत्रसामुग्री ईटेंडर ऐवजी- शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, छत्रपती प्रमिलाराजे रुग्णालय, कोल्हापूर यांचेकडील दिनांक १८.०४.२०२० चे पुरवठा आदेशानुसार करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

४) या RT PCR लॅबसाठी लागणारे आवश्यक ते तांत्रिक मुनष्यबळ व त्यावरील खर्च राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत उपलब्ध निधीतून करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७०६१३०१५६२४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ARCHANA VILAS WALZADE

Digitally signed by ARCHANA VILAS WALZADE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=b17094004b015083dae757656e5d248 47898197ddd6b0366a9177f097ed0887a, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=b4e19876ab3eec36e3a3b98844 1648ab87470cdfe66b14cfbe7ac9bd770485c1, ou=PUBLIC HEALTH DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ARCHANA VILAS WALZADE
Date: 2020.07.08 14:57:59 +05'30'

**(अर्चना वालझाडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३) जिल्हाधिकारी, जिल्हा सातारा.
४) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई व पुणे.
५) जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, सातारा.
६) जिल्हा आरोग्य अधिकारी, सातारा.
७) निवड नस्ती (आरोग्य-५)